**उपजिल्हाधिकारी व तहसिलदार "गट-अ" संवर्गातील उमेदवारांची परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता अनुक्रमे ४३ व ३४ अशी एकूण ७७ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

शासन निर्णय क्रमांकः - ईएसटी-२०१५/प्र.क्र. ५३/ई-८,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०५/०५/२०१५.

**वाचा:-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११/०७/२०१२.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र .टिआरएन-२०१३/प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दि. २०/०१/२०१४.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१४/प्र.क्र. ९९/१४/१२-अ, दि. ०९/०५/२०१४.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०५१४/प्र.क्र. १८/१८-ब, दि. ०८/०८/२०१४.
५. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. टिआरएन०-२१५/प्र.क्र.१८/१५/१८-ब, दि. २५/०२/२०१५.
६. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. टिआरएन०-३१५/प्र.क्र. ३४/१५/१८-ब, दि. ०९/०४/२०१५.

**प्रस्तावना:-**

राज्य सेवा (मुख्य) परीक्षा- २०१४ अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपजिल्हाधिकारी "गट अ" संवर्गातील -४३ उमेदवारांची आणि तहसिलदार "गट-अ" या संवर्गातील पदाकरीता ३४ उमेदवारांची शिफारस केली आहे. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दि. २०/०१/२०१४ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१४/प्र.क्र.९९/१४/१२-अ, दि. ०९/०५/२०१४ अन्वये सन २०१४ पासून महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्या

अनुषंगाने उपजिल्हाधिकारी व तहसिलदार “गट-अ” या संवर्गातील अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य सेवा मुख्यपरीक्षा अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उपजिल्हाधिकारी गट-अ संवर्गासाठी रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे रु. ५४००/-) या वेतनश्रेणीतील ४३ अधिसंख्य पदे व तहसिलदार “गट-अ” संवर्गासाठी रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे रु. ५०००/-) या वेतनश्रेणीतील ३४ अधिसंख्य पदे दिनांक ०२/०५/२०१५ पासून दोन वर्षाच्या कालावधी करीता निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर अधिसंख्य पदे विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. संदर्भाधीन क्र. ५ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २५/०२/२०१५ च्या पत्रात निर्देशित केल्यानुसार संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम दिनांक ०२/०५/२०१५ पासून यशदा, पुणे येथे सुरु होणार आहे. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०५१४/प्र.क्र.१८/१८-ब, दि. ०८/०८/२०१४ अन्वये परिविक्षाधीन अधिकारी तांत्रिक प्रशिक्षणासाठी संबंधित विभागाकडे रुजू झाल्यानंतर त्यांना विभागामार्फत नियमित वेतन अदा करण्यात येईल. तसेच आधीच्या कालावधीत अदा केलेले ठोक वेतन आणि नियमित वेतन यातील फरकाची रक्कम देखील एक रकमी तात्काळ अदा करण्यात येईल.

४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांनी त्रैमासिकरित्या महासंचालक, यशदा, पुणे- ४११००० यांना अग्रिम निधी उपलब्ध करुन द्यावा. सदर प्रशिक्षण मे, २०१५ पासून सुरु होणार असल्यामुळे माहे मे, २०१५ च्या वेतनासाठी त्वरित तर त्यानंतरच्या तिमाहीसाठी ऑगस्ट, २०१५ अखेर, नोव्हेंबर, २०१५ अखेर आणि फेब्रुवारी, २०१६ अखेर या प्रमाणे दोन वर्षाचा परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संपुष्टात येईपर्यंत अग्रिम निधी विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांनी यशदा, पुणे यांना उपलब्ध करुन द्यावा.

५. परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या अधिसंख्य पदावर होणारा खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन, (०१) सर्व साधारण आस्थापना (००) १०१, आयुक्त (०१) (०३) आयुक्त पुणे ( २०५३ ०४२२ ), ०१- वेतन" या लेखाशीर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सदर बाबीसाठी आवश्यक असल्यास अतिरिक्त रकमेसाठी सुधारीत अंदाजामध्ये पूरक मागणीचा प्रस्ताव सादर करावा.

६. संदर्भीय शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि/२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११/०७/२०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०५०२१२५३५५६४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrakant Nivrutti Padale
Date: 2015.05.05 16:13:44 +05'30'

( चं. नि. पाडळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२. महासंचालक, यशदा, पुणे.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
४. प्रधान महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, कार्यासन व्यय-९/ वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
६. अवर सचिव, का.क्र. १२-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७. उप सचिव, कार्यासन ब-१/ ई- २/ई-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
८. निवड नस्ती, ई-८ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.